तिवरे व सागरतटीय जैवविधतेचे संवर्धन प्रतिष्ठानाच्या (MFOM) नियामक मंडळावर सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एस-३०/२०१५/प्र.क्र.२१९/फ-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : ०७ ऑक्टोबर, २०२०.

**पहा :-**

१) शासन निर्णय सम क्रमांक दिनांक २३ सप्टेंबर, २०१५.

२) शासन निर्णय सम क्रमांक दिनांक १० मे, २०१६.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२२(८)/वन्यजीव/ प्र.क्र.५/१५-१६/३९१०; दिनांक २२.०१.२०२० चे पत्र.

**प्रस्तावना :-**

कांदळवन संवर्धनाच्या अधिक परिणामकारक प्रयत्नांसाठी व किनाऱ्यावरील जनतेच्या जीवनमानात सकारात्मक प्रभाव आणण्यासाठी मा.राज्यपाल यांनी दिनांक १२ नोव्हेंबर, २०१४ रोजी दोन्ही सभागृहासमोर केलेल्या अभिभाषणामध्ये तिवरे संवर्धन प्रतिष्ठान स्थापन करण्याची शासनाची भूमिका असल्याबाबत नमूद केले होते. त्यानुषंगाने संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मा.मुख्यमंत्री (Patron) यांच्या आश्रयाखाली तथा मा.मंत्री (वने) यांच्या अध्यक्षतेखाली तिवरे व सागरतटीय जैवविविधतेचे संवर्धन प्रतिष्ठान Mangrove and Marine Biodiversity Conservation Foundation of Maharashtra (MFOM) ची स्थापना करण्यात आली. सदर प्रतिष्ठान तिवरांचे संवर्धन व सागरतटीय जैवविधतेचे संरक्षण करणारी देशातील एकमेव स्वायत्त संस्था आहे.

तिवरे व सागरतटीय जैवविविधतेचे संवर्धन प्रतिष्ठान (MFOM) मध्ये प्रतिष्ठानाच्या घडामोडींचे व्यवस्थापन, पर्यवेक्षण व नियंत्रण ठेवण्यासाठी नियामक मंडळ (Board of Governors) तसेच प्रतिष्ठानाबाबत तात्काळ निर्णय घेण्यासाठी कार्यकारी समिती (Executive Committee) ची स्थापना करण्यात आली आहे. तदनंतर संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये प्रतिष्ठानाच्या नियामक मंडळ (Board of Governors) व कार्यकारी समिती (Executive Committee) स्थापन करुन त्यावर शासकीय / अशासकीय व्यक्ती व संस्था यांची तीन वर्षाच्या कालावधीसाठी नेमणूक करण्यात आली होती.

सदर नियामक मंडळ समितीतील नामनिर्देशीत सदस्यांचा कार्यकाळ दिनांक ९.०५.२०१९ रोजी संपुष्टात आलेला असल्यामुळे मंडळावर नामनिर्देशीत व्यक्ती व संस्था यांची नियुक्ती करण्याबाबत संदर्भात प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये शिफारसी केल्या आहेत.

सदर प्रस्ताव विचारात घेवुन आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :**

तिवरे व सागरतटीय जैवविविधतेचे संवर्धन प्रतिष्ठान (MFOM) मध्ये प्रतिष्ठानात स्थापन केलेल्या नियामक मंडळामध्ये (Board of Governors) खालील व्यक्ती व संस्था यांची सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे :-

२. <u>नियामक मंडळ (Board of Governors)</u>

| अ.क्र. | श्रेणी | व्यक्ती / संस्थेचे नाव |
|---|---|---|
| १ | शासन नामनिर्देशित केलेले विधीमंडळ सदस्य | मा. श्री. वैभव नाईक, विधानसभा सदस्य |
| २ | कांदळवन व सागरी जैवविविधता विषयाबाबतचे तज्ञ व्यक्ती | श्री. एन. वासुदेवन, व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम., लिमिटेड, नागपूर. |
| ३ | शासनाने नामनिर्देशित केलेले मच्छिमार समाजाचे प्रतिनिधी | श्री.रामदास शिंदे, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मच्छीमार सहकारी संघ मर्यादित. (Apex Body) |
| ४ | सागरीतटीय व सागरी जैवविविधता संधारणाबाबतचे कार्य करणाऱ्या अशासकीय संस्था / संस्थेचे प्रतिनिधी | संचालक, बॉम्बे नॅचरल हिस्ट्री सोसायटी (BNHS) |

३. उपरोक्त व्यक्ती / संस्थेची नियुक्ती ३ वर्षाकरिता राहील. प्रतिनिधी म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या व्यक्तींची नियुक्ती जो पर्यंत ते संबंधित संस्थेचे प्रतिनिधित्व करतील तो पर्यंतच वैध (valid) राहील.

४. वरील दोन्ही समित्यांवर नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांना ८९००/- व त्याहून अधिक ग्रेड वेतन असणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या दराने प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. मात्र त्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकुलीत प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००७१७४२०३६६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2020.10.07 17:43:38 +05'30'

( अरविंद आपटे )
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

प्रत :-

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) सचिव, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-३२.
७) प्रधान सचिव (पर्यावरण), मंत्रालय, मुंबई-३२.
८) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) सचिव (पर्यटन व संस्कृती), मंत्रालय, मुंबई-३२.

१०) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ.
१३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), बोरीवली पश्चिम, मुंबई.
१४) श्री. एन. वासुदेवन, व्यवस्थापकीय संचालक, एफ.डी.सी.एम., लिमिटेड, नागपूर.
१५) कमांडर, तटरक्षक दल, पश्चिम मुंबई, महाराष्ट्र
१६) विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई.
१७) आयुक्त, मत्स्यव्यवसाय विभाग, महाराष्ट्र राज्य.
१८) विभागीय आयुक्त कोंकण, नवी मुंबई.
१९) मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
२०) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
२१) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर.
२२) वनसंरक्षक (वन्यजीव), ठाणे.
२३) सचिव सदस्य, महाराष्ट्र किनारी प्रदेश व्यवस्थापन प्राधिकरण.
२४) संचालक, राष्ट्रीय समुद्रशास्त्र संस्था, पणजी, गोवा.
२५) मा. श्री. वैभव नाईक, विधानसभा सदस्य.
२६) श्री.रामदास शिंदे, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मच्छीमार सहकारी संघ मर्यादित.
२७) संचालक, बॉम्बे नॅचरल हिस्ट्री सोसायटी, मुंबई (BNHS)
२८) महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळाचे प्रतिनिधी
२८) निवडनस्ती, फ-३ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.